राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई
निधी वितरीत करण्यास मंजुरी देणेबाबत.
(सन २०१५-१६)

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः काररसे-२०१५/प्र.क्र.२४६/आ-५,

जी.टी.रुग्णालय आवार, कॉम्प्लेक्स बिल्डींग,
८ व १० मजला, नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ७ ऑक्टोबर, २०१५

वाचा :

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र.२९/अर्थ-३, दि. १७ एप्रिल, २०१५.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन ज्ञापन क्रमांकःअर्थसं-२०१५/प्र.क्र.११८/अर्थसंकल्प, दि. ५ जून, २०१५.
४) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे क्र.संआसे/सहाय्यक अनुदाने-रा.र.सं.प./प्र.क्र.५१५/२०१५, दि. २२ जून, २०१५ चे पत्र.

**शासन निर्णय:**

राज्य रक्त संक्रमण परिषद ही शासकीय स्वायत्त संस्था असून या संस्थेचा मूळ उद्देश राज्यात सुरक्षित रक्ताचा मुबलक पुरवठा वाजवी किंमतीत व्हावा हा आहे. या परिषदेसाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात रु. ४२.०० कोटी इतकी तरतूद सहाय्यक अनुदान म्हणून अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. त्यापैकी रु. ४.२० कोटी (अक्षरी चार कोटी वीस लक्ष फक्त) इतके सहाय्यक अनुदान राज्य रक्त संक्रमण परिषदेसाठी माहे एप्रिल व मे, २०१५ या महिन्यातील खर्च भागाविण्यासाठी वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर मंजूर अनुदानातून राज्य रक्त संक्रमण परिषदेमार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध लोकोपयोगी योजना, कर्मचारी वर्गाचे वेतन, रक्तपेढयांना पुरविण्यात येणाऱ्या साहित्य सामुग्रीवरील खर्च भागविण्यात यावा.

२...

सदरचा खर्च खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर-१
२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा विषम चिकित्सा
११०- रुग्णालये व दवाखाने
राज्य योजनांतर्गत योजना
(०६) (२५) रक्त संक्रमण सेवा
३१- सहाय्यक अनुदाने (२२१० ४४७३)

राज्य रक्त संक्रमण परिषदेस वितरीत अनुदानाशी संबंधीत खर्चाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना व सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक, अ.क्र.२७, नियम क्र.१४९ मध्ये केलेल्या सुधारणेनुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकाराखाली निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००७१९४९५९४११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.10.08 11:26:41 +05'30'

**( ज. सु. जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) आणि (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.

२. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे, मुंबई.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई.
५. संचालक, राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई.
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८. नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग, (व्यय-१३), (अर्थसंकल्प-९)मंत्रालय, मुंबई.
१०.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), (लेखा शाखा), मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती (आरोग्य-५)